# चार्ल्स ड्र्यू

## रक्त पेढीचे जनक



ॲन श्रॉफ



चार्ल्स ड्रियू

# एका मुलाचे स्वप्न!

चार्ल्स ड्र्यू यांची बहीण 'एल्सा' आजारी पडली तेव्हा ते फक्त १४ वर्षांचे होते. घरातील सर्वांना खूप काळजी वाटत होती. त्या काळात आजच्यासारख्या वैद्यकीय सुविधा उपलब्ध नसल्यामुळे एल्साची तब्येत बिघडत गेली आणि काही काळातच ती देवाघरी गेली. त्यावेळी ती फक्त १२ वर्षांची होती.

चार्ल्स ड्र्यूला खूप वाईट वाटले. पण त्याक्षणी त्याने मनात निश्चय केला की मोठेपणी डॉक्टर होऊन एल्सासारख्या अनेकांचे प्राण वाचवायचे.



६ महिन्याचा चार्ल्स

चार्ल्स ड्र्यू यांचा जन्म ३ जून १९०४ रोजी वॉशिंग्टन डी सी या ठिकाणी झाला. त्यांचे वडील 'रिचर्ड' लोकांच्या घरात जमिनीवर कार्पेटस बसविण्याचे काम करीत असत. त्यांनी उच्च माध्यमिक शिक्षणही पूर्ण केले नव्हते. पण आपल्या मुलांनी मात्र खूप शिकावे असे त्यांना वाटे. ते मुलांना वाचण्यासाठी पुस्तके आणून देत असत. तसंच म्युझियम दाखवायला घेऊन जात असत.

चार्ल्सची आई 'नोरा' हिनं विद्यापीठातून शिक्षण घेतले होते. ती शिक्षिकेची नोकरी करीत होती. चार्ल्स, एल्सी, जोसेफ, नोरा आणि इवा या पाच मुलांसह ड्र्यू परिवार सुखाने नांदत होता.

चार्ल्सचे प्राथमिक शिक्षण स्टीव्हन्स एलिमेंटरी स्कूलमधे सुरू झाले. ही शाळा कृष्णवर्णीय मुलांसाठी होती. गोरी मुलं, त्यांच्यासाठी असलेल्या शाळेत जायची. त्या काळात गोरे आणि कृष्णवर्णीय ना एका शाळेत शिकू शकत होते ना एकत्र काम करू शकत होते. चार्ल्स अभ्यासात हुशार होता. फूटबॉल आणि बास्केटबॉल हे त्याचे आवडते खेळ होते.



चार्ल्सने केवळ १२ वर्षाचा असतांना रस्त्यावर आणि नाक्यानाक्यावर वर्तमानपत्र विकण्याचा उद्योग सुरू केला. त्याला इतका छान प्रतिसाद मिळाल्यामुळे त्यानं अनेक मुलांना कामावर ठेवलं. उद्योग करण्याचे तंत्र चार्ल्सला चांगले अवगत होते. त्याने कमावलेल्या पैशाची त्याच्या परिवाराला खूप मदत झाली.

चार्ल्स भावंडामधे सर्वात मोठा होता. इवाच्या जन्माअगोदरचे छायाचित्र




१४व्या वर्षी चार्ल्स कृष्णवर्णीय मुलांसाठी असलेल्या डन्बर स्कूलमधे दाखल झाला तिथे त्याला अव्वल गुण मिळाले. खेळामधेही तो अव्वल होताच. फूटबॉल आणि बास्केटबॉल या दोनही खेळामधे त्याने प्राविण्य मिळविले होते. चार्ल्सने 'डॉक्टर' होण्याचे स्वप्न बघितले होते पण ते पूर्ण करण्यासाठी लागणारे पैसे मात्र त्याच्या वडिलांजवळ नव्हते. पण चार्ल्स एक उत्तम खेळाडू असल्यामुळे, खेळाडूंसाठी राखून ठेवलेल्या शिष्यवृत्तीमधून, त्याला शिक्षणासाठी शिष्यवृत्ती मिळण्याची शक्यता होती. शिष्यवृत्ती मिळाली तरच त्याला पुढील शिक्षण घेता येणार होते.

१९२२ मधे चार्ल्सला फूटबॉल खेळाडूंसाठी राखून ठेवलेली शिष्यवृत्ती मिळाली आणि तो मॅसॅच्युसेटस् मधल्या एमहर्स्ट महाविद्यालयात दाखल झाला. एमहर्स्ट महाविद्यालयात एकूण ६०० विद्यार्थी होते. त्यापैकी केवळ १३ विद्यार्थी आफ्रिकी-अमेरिकन म्हणजे कृष्णवर्णीय होते. चार्ल्स प्रथमच गो-या विद्यार्थ्यांबरोबर शिकत होता. ' कृष्णवर्णीय ' असल्यामुळे त्याला अनेक त्रासदायक वागणूकीला सामोरे जावे लागत होते.

चार्ल्स त्यांच्या कॉलेजचा सर्वोत्तम खेळाडू होता. तरी सुध्या जेव्हा एमहर्स्ट कॉलेजची मुलं दुस-या कॉलेज टीमबरोबर खेळत असत तेव्हा खेळ पहाण्यासाठी जमलेली मुलं कृष्णवर्णीय मुलांच्या नावाने आरडाओरडा करीत असत.



फूटबॉल टीमच्या गणवेषात ...चार्ल्स

एकदा फूटबॉल मॅचनंतर सर्व खेळाडूंनी एखाद्या छान हॉटेलमधे जेवण घेण्याचा बेत केला. पण हॉटेलच्या दारातच चार्ल्सला रोखण्यात आले. त्या हॉटेलमधे कृष्णवर्णीयांना प्रवेश नव्हता.

चार्ल्स हुशार असूनही त्याला एमहर्स्ट कॉलेज क्लबचे सदस्यत्व नाकारण्यात आले. कॉलेजच्या संगीत क्लबमधेही चार्ल्सला प्रवेश मिळाला नाही. हे सर्व चार्ल्सला बिलकूल आवडलं नव्हतं. पण ध्येयाकडे लक्ष ठेवून त्यानं अभ्यासावर लक्ष केंद्रित केलं.

कॉलेज शिक्षण पूर्ण झाल्यावर चार्ल्सने बाल्टीमोर येथील मॉर्गन कॉलेजमधे विज्ञान आणि क्रीडाप्रकार शिकविणे सुरू केले. आपल्या पगारातून पै पै वाचवून त्याने मेडिकल स्कूलसाठी लागणारे पैसे जमा केले..आता तो आपले डॉक्टर होण्याचे ध्येय गाठू शकणार होता.




त्या काळात गोरे व कृष्णवर्णीय पाण्याचा एकच नळ वापरू शकत नव्हते.

# एक हुशार तरूण डॉक्टर!

कॅनडातील मॉन्ट्रियल या शहरातील मिकगिल मेडिकल स्कूलमधे चार्ल्सने १९२८ साली प्रवेश घेतला. तेव्हा नातेवाईक व अमेरिकेतील मित्रपरिवारापासून तो खूप दूर गेला होता. जवळ पैसेही बेताचेच होते. मॉन्ट्रियलमधे त्याला खूपच एकाकी वाटत होते. पण डॉक्टर होण्याची इच्छा इतकी प्रबळ होती की त्यामुळेच तो एकाकीपणा सारख्या अनेक गोष्टीवर मात करू शकला.

१९३० साली चार्ल्सने रोसेनबाल्ड स्कॅालरशिप जिंकली. खूप हुशार, असामान्य मुलांचीच या स्कॅलरशिपसाठी निवड होते.

ही स्कॅालरशिप मिळाल्यामुळे चार्ल्सचे जीवन जरा सोपे झाले. आता तो बाहेर एखाद्या हॅाटेलमधे जाऊन जेवूखाऊ तरी शकत होता.



चार्ल्सला कॅनडामधे रहायला आवडत होते कारण तिथे कृष्णवर्णीय - गोरे हा वर्णभेद कमी प्रमाणात होता. कृष्णवर्णीय आणि गोरे लोक आपापसात चांगले संबंध ठेवून होते. या बाबतीत कॅनडामधे वॉशिंग्टन डी सी पेक्षा खूपच वेगळे वातावरण होते. त्यामुळे चार्ल्स खूप मित्र जोडू शकला....अगदी गोरे सुध्दा !

मिकगिल मेडिकल स्कूलमधे चार्ल्स हुशार विद्यार्थ्यांपैकी एक होता





चार्ल्सला त्याचे सर्व मित्र प्रिय होते. त्याच्या मित्रांचाही तो लाडका होता. तो सत्यप्रिय व प्रामाणिक होता. त्यामुळेच तो इतरांना कधी कधी तापट वाटत असे. त्याचा एकटेपणा इथे खूप कमी झाला.

कधी कधी मित्रांबरोबर चार्ल्स एका विशिष्ट हॉटेलमधे त्याच्या आवडीचे पोर्क चॉप्स खायला जात असे.

१९३३मधे चार्ल्सने मिकगिल कॉलेजमधून स्नातक पदवी दुस-या क्रमांकाने मिळविली. चार्ल्सला या यशाने खूप आनंद झाला.

मेडिकल स्कूलमधील शिक्षण पूर्ण केल्यावर आता एखाद्या हॉस्पिटलमधे नामांकित डॉक्टरांच्या हाताखाली काम करून अनुभव मिळविण्यासाठी चार्ल्सने मॉन्ट्रियलमधे एका हॉस्पिटलमधे २ वर्ष नोकरी केली. तो एक उत्तम शल्यचिकित्सक बनला.

त्यानंतर पुढील शिक्षणासाठी चार्ल्सला अमेरिकेतील हॉस्पिटलमधे जावे लागले.



पण त्या गो-या लोकांच्या हॉस्पिटलमधे कृष्णवर्णीय डॉक्टरकडून इलाज करून घेणे ही कल्पना पचनी पडण्यासारखी नव्हती. शेवटी वॉशिंग्टन डी सी मधील हार्वर्ड युनिव्हर्सिटीने चार्ल्सला स्वीकारले. तिथे चार्ल्स मेडिकलच्या विद्यार्थ्यांना शिकवित असे व फ्रिडमन हॉस्पटलमधे रुग्णावर शस्त्रक्रिया करीत असे. अमेरिकेत आल्यामुळे तो आता त्याच्या कुटुंबियांजवळ आला होता. या गोष्टीचा त्याच्या आईला खूप आनंद झाला.



चार्ल्स (मधला) हार्वर्ड युनिव्हर्सिटीमधे
मेडिकलच्या विद्यार्थ्यांना शिकवित होता.

# रुग्णांवरील उपचार

हार्वर्ड युनिव्हर्सिटी व फ्रिडमन हास्पिटलमधे काम करून चार्ल्सने सिध्द केले की तो एक हुशार व कुशल डॉक्टर आहे. तेथील अनुभवी डॉक्टरांच्याही लक्षात आले की चार्ल्स ही एक वेगळीच होतकरु व्यक्ती आहे.

१९३८ मधे चार्ल्सने रॉकफेलर स्कॉलरशिप मिळविली. या पैशामधून तो पुढील शिक्षण घेऊ शकणार होता. कोलंबिया युनिव्हर्सिटी मेडिकल स्कूलमधे विशेष शल्यचिकित्सा शिकण्यासाठी त्याला प्रवेश मिळाला.

कोलंबियामधे विश्वविख्यात डॉक्टरांबरोबर काम करण्याची संधी चार्ल्सला मिळाली. त्यातील एक होते जॉन स्कडर! रक्त देऊन रुग्णाचा जीव वाचविण्यात ते नामांकित होते.





आतापर्यंत कोलंबिया युनिव्हर्सिटीच्या मेडिकल स्कूलमधे कृष्णवर्णीय डॉक्टरने कधीच काम केले नव्हते. तेथे बरेच कृष्णवर्णीय रुग्ण येत असत पण कृष्णवर्णीय व्यक्तीला डॉक्टर म्हणून काम करायला मनाई होती. चार्ल्सने ही परिस्थिती बदलून टाकली. चार्ल्स स्वत: एक कुशल डॉक्टर होते. अन्याय सहन न होणारे पण मैत्री जपणारे होते. इतर डॉक्टर्स व रुग्णांना ते हवे होते. त्यांचा चार्ल्सवर विश्वास होता. त्याच्या त्वचेचा रंगामुळे इथे काही फरक पडत नव्हता.

कोलंबिया युनिव्हर्सिटीमधे चार्ल्स रक्ताविषयी खूप नवीन गोष्टी शिकला.

१९३९ मधे चार्ल्स अलाबामा येथे गेले. तिथे काही काळ त्यांनी ‘हेल्थकेअर क्लिनिकमधे काम केले जिथे गरीब रुग्णांवर इलाज केला जात असे. अलाबामाला जाताना ते ॲटलांटामधे त्यांच्या मित्राला भेटायला गेले. तिथे त्यांची ओळख लिनोर रबबिंस या शिक्षिकेबरोबर झाली. २३ डिसेंबर १९३९ रोजी त्या दोघांनी लग्न केले.नंतरच्या काळात त्यांना ४ मुले झाली. रॉबर्टा (बेबे), शर्लीन, रिहा आणि चार्ल्स ज्युनिअर.

जून १९४० मधे कोलंबिया युनिव्हर्सिटीने चार्ल्सना ' डॉक्टर ऑफ मेडिकल सायन्स' ही पदवी प्रदान केली. ही पदवी मिळविणारे चार्ल्स हे पहिले आफ्रिकी-अमेरिकन होते.

कोलंबिया युनिव्हर्सिटीमधे असताना रक्त दिल्यामुळे लोकांचे प्राण कसे वाचविले जाऊ शकतात याचा सखोल अभ्यास चार्ल्सनी केला. एखाद्या दुर्घटनेमधे लोकांना मोठ्या प्रमाणात रक्तस्त्राव होतो. अशावेळी बाहेरून रक्त दिल्यास त्यांचे प्राण वाचू शकतात. यालाच ' ब्लड ट्रान्सफ्यूजन' असे म्हणतात.







ड्रियू परिवार घरात असतांना..... डावीकडून रिहा, चार्ल्स, शर्लीन, रॉबर्टा उर्फ बेबे, लेनोर, आणि चार्ल्स ज्युनियर

रक्त शरीराबाहेर सुरक्षित संग्रहित करण्याची पध्दती चार्ल्स यांनी विकसित केली. रुग्णाचे संकटकाळी प्राण वाचविण्यासाठी त्याला तात्काळ रक्त पुरवठा होणे खूप गरजेचे असते. त्यामुळे रक्त संग्रहित करणे फार महत्वाचे आहे. ज्या ठिकाणी रक्त संग्रहित केले जाते त्या जागेला 'रक्त पेढी' म्हणतात. रक्तातील द्रवरुप पदार्थ, प्लाझ्मा आणि लाल रक्तपेशी वेगवेगळ्या केल्या तर रक्त जास्त कालावधीसाठी सुरक्षित राहू शकते हे चार्ल्स यांच्या लक्षात आले. प्लाझ्मा या रक्तातील द्रवरूप पदार्थामुळे रक्त रुग्णाच्या शरिरात सोडणे शक्य आहे हेही चार्ल्स यांच्या लक्षात आले. 'रक्त' देऊन रुग्णांचे, लोकांचे प्राण कसे वाचविले जाऊ शकतात याचे ज्ञान चार्ल्सला इतर डॉक्टरापेक्षा कितीतरी जास्त होते.

# 'रक्त' देऊन लोकांचे प्राण वाचविणे

१९३९ मधे दुसरे महायुध्द सुरू झाले. युरोपमधे बरेच सैनिक युध्दामधे जखमी होत होते. इंग्लंडवर सतत बॉम्बचा मारा होत होता. तेथील हजारो लोकांचे प्राण वाचविण्यासाठी 'रक्ताची' जरूर होती. इंग्लंडमधे रक्ताचा संग्रह कमी पडू लागला. अमेरिकेहून रक्त आयात करण्यासाठी मदत मागण्यात आली. चार्ल्स यांच्यावर ही महत्वपूर्ण कामगिरी सोपविण्यात आली. चार्ल्स यांना 'ब्लड टू ब्रिटन' या कार्यक्रमाचे प्रमुख बनविण्यात आले.

ब्रिटनच्या लोकांना लवकरात लवकर रक्ताचा पुरवठा होईल अशी पध्दत चार्ल्स यांनी विकसित केली. अमेरिकन लोकांना रक्तदान करता यावं अशी रक्तदान केंद्रं त्यांनी जागोजाग उभी केली. ब्रिटनमधल्या लोकांना रक्ताची गरज असल्याचं कळल्यावर या केंद्रांवर रक्तदानासाठी अमेरिकन लोकांनी रांगा लावल्या होत्या.



चार्ल्स ( डावीकडून पहिले) यांनी पहिली मोबाईल ब्लड बँक सुरू केली. त्यासाठी त्यांनी रुग्णवाहिकेचा उपयोग केला.



ऋग्णाला जरूर पडेल तोपर्यंत रक्त संग्रहित करून ठेवले जाऊ शकते.

चार्ल्स यांनी 'रक्त पेढ्यांची' स्थापना केली. 'रक्त पेढी' बद्दल त्यांचा खूप अभ्यास केला होता.

त्यांनी रक्ताचं दोन वेळा परीक्षण करण्याची पध्दती रूढ केली. कोणत्याही प्रकारचे रोगाचे जंतु संग्रहित रक्तामधे असल्यास, त्या रक्तामुळे रुग्णाचा मृत्यू होऊ शकतो म्हणून ही काळजी घेणे अत्यंत महत्वाचे होते.

चार्ल्स यांनी ब्रिटनला तात्काळ रक्त मिळेल अशी व्यवस्था केली. त्यामुळे हजारो ब्रिटीश नागरिकांचे प्राण वाचले. चार्ल्स यांच्या या क्रांतिकारी शोधामुळे गरज असलेल्या ठिकाणी तात्काळ रक्त पुरवठा करणे शक्य झाले.

यानंतर सगळीकडे युध्द असो वा कोणतेही नैसर्गिक किंवा प्राकृतिक संकट असो, चार्ल्स यांची रक्तपेढी योजना अंमलात आणली गेली. शुध्द स्वरूपात रक्त एकत्र करून त्याचा संग्रह करणे आणि संकटसमयी ते लोकांपर्यत तात्काळ पोहोचविणे ही व्यवस्था चार्ल्स यांनी विकसित केली होती.




ब्रिटनने लोकांना रक्तदान करण्याचे आव्हान करणारी भित्तीचित्रे तयार केली.

अमेरिकेतील गो-या व कृष्णवर्णीय नागरिकांनी ब्रिटनसाठी रक्तदान केले होते. आज आपण जाणतो की सर्वांचे रक्त सारखेच असते. पण कृष्णवर्णीय आणि गो-या लोकांचे रक्त वेगवेगळे संग्रहित करणे आवश्यक आहे. तसंच गो-या माणसाला कृष्णवर्णीय माणसाचे रक्त देणे गैर आहे अशी अनेकजणांची समजूत होती. हे पूर्ण चुकीचे होते. अशा गोष्टीमुळे चार्ल्स दु:खी होत असत..!

# शिक्षक व नेता

चार्ल्स यांनी अमेरिकेत अनेक रक्त पेढ्यांची स्थापना केली. 'अमेरिकन रेड क्रॉस' या संस्थेबरोबर काम केले. सेना आणि जवानांसाठी सामान्य नागरिकांचे रक्त संग्रहित केले.' रेड क्रॉस' संस्थेने काळ्या लोकांचे रक्त स्वीकारण्यास नकार दिला. साहजिकच चार्ल्स यांना खूप राग आला.

चार्ल्स आपल्या हार्वर्ड युनिव्हर्सिटी व फ्रिडमन हॉस्पिटलमधे परतले. तिथे त्यांनी कृष्णवर्णीय डॉक्टरांना प्रशिक्षण दिले.

गो-या डॉक्टरांना मिळणारी मानाची वागणूक कृष्णवर्णीय डॉक्टरांनाही मिळायला हवी असे चार्ल्स याना मनोमन वाटे. कृष्णवर्णीय डॉक्टर्सही आपल्या कामात तरबेजच असायला हवेत यासाठीही चार्ल्स प्रयत्नशील राहिले. चार्ल्सच्या मते ही त्यांच्या जीवनातील सर्वात महान कामगिरी होती.



आता चार्ल्स यांना खूपच प्रसिध्दी मिळाली होती. एखाद्या कंपनीसाठी काम करून त्यांना गडगंज संपत्ती कमावता आली असती. पण पैशापेक्षा त्यांचे लोकांवर प्रेम होते. दरम्यान फ्रिडमन हॉस्पटलने चार्ल्स यांना 'प्रमुख डॉक्टर' म्हणून नियुक्त केले.



चार्लस व ब्लड बॅकेत काम करणारे सहकारी

चार्ल्स दिवसाचे १६ तास काम करीत असत. सिगारेट, दारू यासारखे कसलेही व्यसन त्यांना नव्हते. चुकूनही त्यांच्या तोंडून अपशब्द बाहेर पडत नसत. विद्यार्थ्यांसाठी चार्ल्स एक आदर्श शिक्षक होते. एक चांगला आदर्श डॉक्टर बनण्यासाठी दया व प्रेम आवश्यक आहे याची जाणीव ते विद्यार्थ्यांना करून देत.

चार्ल्स यांना कृष्णवर्णीय डॉक्टरांच्या जीवन संघर्षाची जाणीव होती. त्या काळी रुग्ण कृष्णवर्णीय डॉक्टरांकडून तपासणी करून घ्यायला नाखूष असत. चार्ल्स स्वत:प्रमाणेच त्यांनीदेखील आपला संघर्ष चालू ठेवायला सांगत असत.



चार्ल्स यांच्यासाठी तरूण अश्वेत डा◌ॅक्टरांना प्रशिक्षित करणे अत्यंत महत्वाचे होते.



१९४४ मधे चार्ल्स यांना 'नॅशनल असोसिएशन ऑफ कलर्ड पीपल' या संस्थेतर्फे ' स्पनगर्न मेडल' मिळाले. हा अतिशय महत्वपूर्ण पुरस्कार प्रसिध्द कृष्णवर्णीय व्यक्तींनाच दिला जातो.

याहूनही एक आनंददायी सुवर्णक्षण चार्ल्स यांच्या आयुष्यात येणार होता. चार्ल्स कृष्णवर्णीय डॉक्टरांना शल्यचिकित्सा शिकवित असत. अंतिम परिक्षेच्यावेळी कृष्णवर्णीय डॉक्टर्सचे प्रतिस्पर्धी गोरे डॉक्टर्स होते. आपले विद्यार्थी अव्वल ठरावेत असे चार्ल्स यांना मनापासून वाटत होते.

त्यानंतर जाहीर झालेले निकाल पाहून चार्ल्स यांना खूपच आनंद झाला कारण त्यांचा विद्यार्थी सर्वप्रथम आला होता..!

चार्ल्स यांनी मृत्यूपूर्वी केवळ २ दिवस आधी भाषण केले होते.



१९४१ ते १९५० च्या दरम्यान अमेरिकेतील अर्ध्याहून जास्त कृष्णवर्णीय डॉक्टरांना एकट्या चार्ल्स यांनी प्रशिक्षण दिले होते. त्यांचे स्वप्न साकार झाले होते. ज्या कृष्णवर्णीय डॉक्टरांना त्यांनी प्रशिक्षित केले होते ते सर्व प्रसिध्दीच्या शिखरावर पोचले. त्यांनी सिध्द करून दाखविले की कोणत्याही बाबतीत ते गो-यांपेक्षा कमी नव्हते.

१९५० मधे चार्ल्स पुन्हा अलाबामा येथील गरिबांसाठी असलेल्या दवाखान्यात गरीबांची सेवा करण्यासाठी गेले. हे कामही त्यांच्यासाठी महत्वाचे होते. पण अलाबामा येथे जातांना त्यांच्या गाडीला झालेल्या अपघातामधे त्यांचे दु:खद निधन झाले. त्याळी ते फक्त ४५ वर्षांचे होते.



जगातील कानाकोप-यात आज चार्ल्स यांच्या कामाची प्रशंसा होत आहे. रुग्णाला तात्काळ रक्त मिळण्याची व्यवस्था त्यांनी निर्माण केली. रक्ताबद्दल डॉक्टरांना असलेल्या ज्ञानात चार्ल्स यांनी महत्वपूर्ण भर टाकली. याबरोबर अनेक अश्वेत डॉक्टरांना प्रशिक्षित केले.




चार्ल्स यांच्या सन्मानार्थ पोस्टाचे तिकिट काढले.

आयुष्यात आलेल्या कुठल्याही संकटाला चार्ल्स यांनी त्यांच्या स्वप्नपूर्तीच्या आड येऊ दिले नाही. एक कुशल डॉक्टर बनण्यासाठी त्यांनी अविरत परिश्रम घेतले. आणि त्याबरोबर कृष्णवर्णीय डॉक्टरांना स्वावलंबी बनण्यासाठी प्रशिक्षित केले, त्यांच्यासाठी एक महामार्ग तयार करून ठेवला.

नंतर अमेरिकेत अनेक शाळांनी 'डॉ. चार्ल्स ड्र्यू ' यांचे नाव शाळेला देऊन त्यांना सन्मानित केले. १९८१ साली त्याच्या जन्मदिवशी त्यांच्या सन्मानार्थ पोस्टाचे तिकिट काढले. लॉस एन्जेलिसमधे त्यांच्या नावाने मेडिकल कॉलेज सुरू केले गेले. आपल्या ४५ वर्षाच्या अल्प आयुष्यात 'डॉ. चार्ल्स ड्र्यू' यांनी 'जग' सुंदर बनविण्याचा मनापासून प्रयत्न केला....!!




"तुमचा निश्चय पक्का असेल तर तुम्ही काहीही करू शकता."
इति चार्ल्स ड्र्यू.

## जीवनकाल



| | |
|---|---|
| १९०४ | जून मध्ये वॉशिग्टन डीसी मधे जन्म |
| १९२६ | एमहर्स्ट कालेजमधून 'स्नातक' पदवी, मॉर्गन कालेजमधे शिक्षक |
| १९३३ | मिकगिल युनिव्हर्सिटी मेडिकल कॉलेजची स्नातक पदवी प्रदान |
| १९३५ | हार्वर्ड युनिव्हर्सिटी , फ्रिडमन कॉलेजमधे शिक्षक |
| १९३८ | रॉकफेलर स्कॉलरशिप मिळाल्यावर कोलंबिया युनिव्हर्सिटीत प्रवेश |
| १९३९ | लेनोर रबबिंस बरोबर विवाह |
| १९४० | कोलंबिया युनिव्हर्सिटी कडून 'मास्टर्स' पदवी |
| १९४१ | “ब्लड फार ब्रिटन” या सेवेचे प्रमुख पद |
| १९४४ | स्पनबर्ग पदक प्राप्त |
| १९५० | गाडी दुर्घटनेमधे अपघाती मृत्यू |



